


**महाराष्ट्र शासन**
सामान्य प्रशासन विभाग,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक२२-७९४२५७ Email ID : Desk 14b.gad-mh@gov.in

..................................................................................................................................

**क्रमांक : कअनि-११२१/प्र.क्र.७१/१४-ब** **दिनांक : २७ ऑक्टोबर २०२१**

प्रति,

सह/उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**विषय :** वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर या कार्यालयांतील प्रशासकीय अधिकारी पदांवर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.

**संदर्भ :** सा.प्र.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दि.३१.०८.२०१७

महोदय/महोदया,

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहीत करण्यात आली आहे. त्यानुसार वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर या कार्यालयातील "प्रशासकीय अधिकारी" (वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० ग्रेड पे रु.५४००/- सहावा वेतन आयोग) [सातवा वेतन आयोग वेतनस्तर एस-२० (रु.५६१००-१७७५००)] हे पद प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मंत्रालयीन अवर सचिव अथवा कक्ष अधिकारी वर्ग २ संवर्गातील [सातवा वेतन आयोग वेतनस्तर एस-२० (रु.५६१००-१७७५००)] नियमित चार वर्षे पूर्ण होऊन रु.५४००/- ग्रेड वेतन घेणाऱ्या अधिकाऱ्यांमधून इच्छुकता मागविण्यात येत आहे.

२. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, सदर पत्र आपल्या विभागाच्या आस्थापनेवरील कक्ष अधिकाऱ्यांच्या तात्काळ निदर्शनास आणावे. त्यानुसार प्रतिनियुक्तीसाठी इच्छुकता दर्शविलेल्या कक्ष अधिकाऱ्यांची सोबतच्या विवरणपत्रातील माहिती विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने या विभागास दि.१५.११.२०२१ पर्यंत उपलब्ध करुन द्यावी.

३. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२११०२७१५०१०४८००७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

आपला,

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2021.10.27 18:03:32 +05'30'

**(ग.भि.गुरव)**
**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

प्रत :- संचालक, वसंतराव नाईक राज्य कृषी विस्तार व्यवस्थापन प्रशिक्षण संस्था (वनामती), नागपूर